**मुद्रांक शुल्कासोबत अतिरीक्त १% अधिभारामुळे जमा होणा-या रकमांचे माहे एप्रिल ते जून २०१५ या कालावधीमधील अनुदान संबंधित महानगरपालिकांना वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः स्थासंक-२०१५/३५२/प.क्र. ९९/नवि-३२**

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

दिनांक: १४ ऑगस्ट, २०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्र :स्थासंक-२०१५/प्र.क्र.३५/नवि-३२ दि.०९. जून २०१५

२) शासन निर्णय क्र: स्थासंक-२०१५/प्र.क्र.३५/नवि-३२ दि.२१. जुलै २०१५.

३) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र, राज्य पुणे यांचे पत्र क्र.७/लेखा/मनपा/९८७/२०१५ दिनांक ०४.०८.२०१५.

**प्रस्तावना :-**

महानगरपालिकांना १% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणाऱ्या रक्कमा वितरीत करण्यासाठी सन २०१५ -२०१६ च्या अर्थसंकल्पामध्ये रु.९००.०० कोटीची तरतूद मंजूर आहे. वित्त विभागाने ७०% च्या मर्यादेत रू.६३०.०० कोटी इतकी रक्कम अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करून दिली आहे. त्यामधून मा. उच्च न्यायालयाच्या खंडपीठ नागपूर यांनी याचिका क्र.६५७४/२०१३ मध्ये दिनांक ०३.०२.२०१५ रोजी दिलेल्या आदेशानुसार महानगरपालिकांकडे थकीत असलेल्या रक्कमा रू.१०३.७९ कोटी त्यांना देय असलेल्या अनुदानातून कपात करून दिनांक ०९ जून २०१५ च्या आदेशान्वये महाराष्ट्र जिवन प्राधिकरणास देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. यास्तव आता ७०% चे मर्यादेमध्ये वितरणासाठी रू.५२६.२१ कोटी ऐवढी रक्कम शिल्लक होती. त्यामधुन मागील आर्थिक वर्षातील जानेवारी फेब्रुवारी व मार्च या महिन्याची रु. १४८.५८,४४,०००/- इतकी थकबाकी वितरीत केली आहे. आत्ता वितरणासाठी रु. ३७७.६३ कोटी शिल्लक राहतात. मुद्रांक शुल्क कार्यालय, पुणे यांनी एप्रिल, मे, जून या तीन महिन्यासाठी २५ महानगरपालिकांना रु.१९८.४२ कोटी देय असल्याचे कळविले आहे. या अगोदर सदंर्भ क्र. स्थासंक-२०१५/प्र.क्र.३५/नवि-३२ दि.०९. जून २०१५ रोजीच्या शासन निर्णयन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या थकीत रक्कमा महानगरपालिकानिहाय्य शासनाने वितरीत केल्या असल्याने या रकमांचे समायोजन त्या त्या महानगरपालिकांना देय असलेल्या रकमांमधून करणे आवश्यक आहे. हे समायोजन केल्यानंतर महानगरपालिकांना एकुण रू.१६७.९९ कोटी देय असून त्याचे वितरण खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

२५ महानगरपालिकांची एप्रिल, मे व जून २०१५ या कालावधीतील थकबाकी रक्कम रू. १६७,९९,०७,१९६/- (अक्षरी रू. एकशे सदुसष्ठ कोटी नव्यानव लक्ष सात हजार एकशे शहान्नव फक्त) खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | महानगर पालिकेचे नाव | एप्रिल, मे व जून २०१५ मधील एकूण देय रक्कम | म.जी.प्रा.ला दि.९.६.१५ च्या आदेशान्वये मनपांकडून प्रत्यक्षात वसूल केलेली रक्कम | दि.९.६.१५ आदेशान्वये कपाती नंतर महानगरपालिकांना देय रक्कम पूर्णांकात |
|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | २६४३४५१८२ | ० | २६४३४५००० |
| २ | नवी मुंबई | १२३४४८७०० | ० | १२३४४९००० |
| ३ | मीरा भाईंदर | १०९८४०३१४ | १३९००००० | ९५९४०००० |
| ४ | कल्याण डोंबीवली | ११८७४०९७७ | ८९००००० | १०९८४१००० |
| ५ | भिवंडी-निजामपूर | २८६३९५३० | १३७००००० | १४९४०००० |
| ६ | वसई-विरार | १५५२३८७०३ | ३००००० | १५४९३९००० |
| ७ | उल्हासनगर | ११९८४५६४ | ११९८४५६४ | ० |
| ८ | पुणे | ४६०९१५९१७ | ८४००००० | ४५२५१६००० |
| ९ | पिंपरी-चिंचवड | २६९७५१५८६ | २००००० | २६९५५१००० |
| १० | सांगली-मिरज-कुपवाड | १५३३९७८५ | १०५००००० | ४८४०००० |
| ११ | कोल्हापूर | २३९१७२१४ | २३९१७२१४ | ० |
| १२ | सोलापूर | १९१९९२४० | ६७००००० | १२४९९००० |
| १३ | नाशिक | १३९४५६३५४ | ० | १३९४५६००० |
| १४ | मालेगांव | ६१२७९५७ | ६१२७९५७ | ० |
| १५ | अहमदनगर | १६९६९५०५ | १६९६९५०५ | ० |
| १६ | जळगांव | ११८४६७८० | ० | ११८४७००० |
| १७ | धुळे | ५४४९३४३ | ५४४९३४३ | ० |
| १८ | औरंगाबाद | ३१०११०९३ | ९६००००० | २१४११००० |
| १९ | लातुर | ५६९२१७१ | ५६९२१७१ | ० |
| २० | नांदेड | १०१३३०३५ | ५८००००० | ४३३३००० |
| २१ | परभणी | १९२०३४३ | १९२०३४३ | ० |
| २२ | अमरावती | १६८३४६३५ | १६८३४६३५ | ० |
| २३ | अकोला | ८६५१३६३ | ८६५१३६३ | ० |
| २४ | नागपूर | १२४५०४४८० | १२४५०४४८० | ० |
| २५ | चंद्रपूर | ४२५०२२५ | ४२५०२२५ | ० |
| एकूण- | | १९८४२०८९९६ | ३०४३०१८०० | १६७९९०७००० |

२. सदर अनुदान उपरोल्लोखित महानगरपालिकांना वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी सदर अनुदान कोषागारातून आहरण करून संबंधित महानगरपालिकांना तात्काळ वितरीत करावे.

३. याकरीता होणारा खर्च "( मागणी क्रमांक एफ-४, ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २०० , इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा, (००) (०९) स्थानिक संस्थानी जकातीचे पुन:स्थापन केल्यामुळे महानगरपालिका क्षेत्रातील मुद्रांक शुल्कावर १% अधिभार देण्याच्या दृष्टिने महानगरपालिकांसाठी तरतूद (३६०४०९२४) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर १% अधिभारापोटी जमा रकमेचा तसेच त्यापोटी वितरीत करण्यात येणाऱ्या या सहायक अनुदानावरील खर्चाचा हिशोब संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी स्वतंत्रपणे ठेवावा व याबाबतचे लेखे व तत्संबंधी सर्व कागदपत्रे महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना, आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावीत.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१४१२४७२६६७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Govind Lokhande

Digitally signed by Govind Lokhande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ce89373fc7a728d2cdfa1a26c08e1e3f7e3f4f232c1bd146794d3cc3034d5701, cn=Govind Lokhande
Date: 2015.08.14 12:56:21 +05'30'

**( गो. आ. लोखंडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संबंधित जिल्हाधिकारी.

२. आयुक्त संबंधित महानगरपालिका.

३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (मुंबई/नागपूर).

४. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

६. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा कोषागार अधिकारी.

७. नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पुणे.

८. वित्त विभाग व्यय-३/अर्थोपाय/अर्थ-१६,मंत्रालय,मुंबई.

९. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.

१०.मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव.

११.कार्यासन अधिकारी नवि-४, मंत्रालय,मुंबई.

१२.निवड नस्ती, नवि-३२.